**ई-कॅबिनेट प्रणाली बाबत...**

**ॲपल ब्रँड चे आयपॅड व तद्नुषंगिक वस्तू खरेदी करण्यासाठी पुरवठा आदेश देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : एसटीवाय-२०२५/प्र.क्र.१९/मंआस्था-२ (२१-अ)**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०००३२

**दिनांक : ४ जून, २०२५.**

**संदर्भ:** १) प्रकल्प अंमलबजावणी समितीचे बैठकीचे इतिवृत्त समक्रमांक दिनांक ०९/०४/२०२५.

२) सामन्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्रमांक- एसटीवाय-२०२५/ प्र.क्र.१९/ मंआस्था-२ (२१-अ), दि.०९/०४/२०२५.

**प्रस्तावना-:**

राज्य शासनाच्या ई-कॅबिनेट प्रणालीच्या अनुषंगाने, मा.मंत्री परिषदेच्या सर्व सदस्य व संबंधित अधिकारी यांच्याकरिता ॲपल ब्रँड चे आयपॅड व इतर संलग्न साहित्य खरेदी ई-निविदाव्दारे करण्यास संदर्भाधिन क्र.२ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात आलेली आहे. त्यानुसार दिनांक ०९/०४/२०२५ रोजी ई-निविदा प्रसिध्द करण्यात आली. सदर निविदेच्या अनुषंगाने तांत्रिक निविदा छाननीमध्ये एकही निविदाकार पात्र न ठरल्यामुळे १५ दिवसाचा कालावधी देवून दिनांक १३/०५/२०२५ रोजी पुनर्निविदा प्रसिध्द करण्यात आली. तसेच याबाबतची सूचना एक विभागीय स्तरावरील व राज्य स्तरावरील वर्तमानपत्रामध्ये तसेच शासनाच्या संकेतस्थळावरही देण्यात आली. त्यानुसार प्राप्त झालेल्या निविदाची तांत्रिक व व्यावसायिक छाननी केल्यानंतर पात्र एल-१ निविदाकाराची निविदा स्विकारण्याची व पुरवठा आदेश देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय-:**

विभागीय खरेदी समितीव्दारे ई-निविदे संदर्भात करण्यात आलेल्या तांत्रिक व व्यावसायिक छाननीअंती रेडियस सिस्टीम या सेवा पुरवठादार संस्थेची निविदा एल-१ असल्यामुळे सदर निविदा स्वीकारण्यात येऊन पुढीलप्रमाणे वस्तुंचा पुरवठा करण्यासाठी त्यांना पुरवठा आदेश देण्यात येत आहेत. याबाबतचा तपशील पुढीलप्रमाणे आहे:-

| अ. क्र. | वस्तुचे नाव | नग | एल-१ नुसार प्रति नग दर रु. १८% GST सह किंमत रु. (एल-१) | १८% GST सह किंमत रु. (एल-१) | एकूण ५० नगा नुसार रक्कम |
|---|---|---|---|---|---|
| १ | Apple iPad | ५० | १,४०,५४५/- | १,६५,८४३.१ | ८२,९२,१५५/- |
| २ | Magic Keyboard | ५० | २६,४३०/- | ३१,१८७.४ | १५,५९,३७०/- |
| ३ | Apple Pencil | ५० | ६,१६०/- | ७,२६८.८ | ३,६३,४४०/- |
| ४ | Apple Cover | ५० | ७,५००/- | ८,८५० | ४,४२,५००/- |
| ५ | Adaptor | ५० | १/- | १.१८ | ५९/- |
| ६ | Cable | ५० | १/- | १.१८ | ५९/- |
| | TOTAL | | १,८०,६३७/- | २,१३,१५१.६६/- | १,०६,५७,५८३/- |

२. प्रस्तुत पुरवठा आदेशाच्या अनुषंगाने अटी व शर्ती पुढीलप्रमाणे राहातील:-

२.१. वरीलप्रमाणे नमूद वस्तुंची शासनास तातडीने आवश्यकता असल्याने पुरवठादारास या पुरवठा आदेशाच्या दिनांकापासून १ आठवडयात वस्तुंचा पुरवठा करणे बंधनकारक राहिल.

२.२ शासनाने विहित केलेल्या विनिर्देश (Specification) प्रमाणे पुरवठा करणे आवश्यक राहील. विनिर्देश (Specification) प्रमाणे वस्तु नसेल व वस्तुमध्ये काही बिघाड असल्यास सदर वस्तु नव्याने उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी, कोणत्याही आकाराशिवाय पुरवठादाराची राहील.

२.३ पुरविण्यात आलेली वस्तु ही सुस्थितीत व विनिर्देश (Specification) प्रमाणे असल्याचे खात्री केल्यानंतर देयक अदा करण्याची कार्यवाही करण्यात येईल.

२.४ सर्व वस्तुचे शासनाने दिलेले विनिर्देश (Specification) इन बिल्ट असावे. त्यामध्ये निविदाकराने कोणतही छेडछाड/ सुधारणा (Modification) करु नये तसेच याबाबतचे हमीपत्र सेवापुरवठादाराने देणे बंधनकारक राहील.

२.५ पुरवठा केलेल्या वस्तुचा मॉडेल क्रमांक व विनिर्देश (Specification) ची प्रत पुरवठा करताना डिलीव्हरी चलन सोबत सादर करावी.

२.६ पुरवठादारास पुरवठा आदेशाच्या ३ टक्के अनामत रक्कम ३ वर्षे या वॉरटी कालावधीसाठी बँक गॅरटीस्वरुपात आदेशाच्या दिनांकापासून १५ दिवसाच्या आत सादर करावे लागेल.

२.७ पुरविण्यात येणारे साहित्य २०२४ पूर्वी लॉच केलेले नसावे. तसेच सर्व हार्डवेअर हे नवीन व ब्रॅन्डेड असणे आवश्यक आहे.

२.८ वॉरटी कालावधीत देखभाल व दुरुस्तीबाबत हमी (विना खर्च) निविदाकारास द्यावी लागेल.

२.९ ॲपल आयपॅडच्या कव्हरवर “अशोक स्तंभ, सत्यमेव जयते” या लोगोसह “महाराष्ट्र शासन” ही अक्षरे कोरण्यासाठी (Embossing) सेवा पुरवठादाराने मौखिकरित्या संमती दिलेली आहे. सदर काम सेवा पुरवठादाराने विनामुल्य करुन द्यावे.

२.१० वरील विवरणपत्रातील अनुक्रमांक ४ येथील वस्तू एल २ या निविदाकराने विहित केलेल्या निन्म दराने पुरवठा करण्यास रेडियस सिस्टीम या सेवा पुरवठादाराने तयार असल्याचे कळविले

आहे. तसेच अनुक्रमांक ५ व ६ येथील वस्तुचा पुरवठा ॲपल आयपॅड सह करण्यात येणार असल्याचे ही या सेवा पुरवठादारने कळविले आहे. त्यानुसार पुरवठा करणे आवश्यक राहील.

३. सदरचा खर्च लेखाशिर्ष “मागणी क्र.ए-१, २०१३- मंत्री परिषद, (८००) इतर खर्च,(००)(०१) इतर खर्च (अनिवार्य) (२०१३००५३) १७- संगणक खर्च या लेखाशीर्षाखाली सन २०२५-२६ या आर्थिक वर्षातील उपलब्ध तरतुदीतून भागविण्यात यावा.

४. सदर मान्यता शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल,२०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, भाग पहिला, उपविभाग-२,अ.क्र.२७-अ नियम क्र.७६ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकात देण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०६०४१२२९४६१३०७ असा आहे. डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA GOPALKRISHNA GAIKWAD

Digitally signed by RAJENDRA GOPALKRISHNA GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=e18e8c2154c8ecbcf0edc1fcc5b3e74c50aa53537f32c40ea2c1af9814e56681, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=021D4BA37C61940F8B373F5BEB2D6BCA43B8F4858CE3ADE3FD42291B9038E881, cn=RAJENDRA GOPALKRISHNA GAIKWAD
Date: 2025.06.04 12:50:10 +05'30'

**(रा.गो.गायकवाड)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मे. रेडियस सिस्टीम प्रायव्हेट लिमिटेड, युनिट नं.१२०, लिंक रोड, लिंकवे ईस्टेट परिसर कॉ.औ.सोसायटी, चिंचोली, मालाड (पश्चिम), मुंबई ४०० ०६४.

**प्रत:-**

१. महालेखापाल,(लेखा परिक्षक-१) मुंबई .
२. महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेयता-१) मुंबई.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (सा.प्र.वि. कार्या.मंआस्था-३-रोख शाखेमार्फत).
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
५. सह/उप सचिव, मुख्य सचिव कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
६. अवर सचिव तथा आहरण व संवितरण अधिकारी, सा.प्र.वि. रोख शाखा
७. निवड नस्ती, कार्या.मंआस्था-२